डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशनची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या सप्टेंबर-२०२४ ते फेब्रुवारी-२०२५ या कालावधीतील वेतनासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७२४/प्र.क्र.४२/ई-१०४०२००/१अे**

**(ई-फाईल क्र. कृवपदुम-१२०२७/१७/२०२४-MAG-1A संगणक क्र.८१४७११)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२५.

वाचा :- १. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.जैशेमि-१०१८/प्र.क्र.१२५/१७-अे, दिनांक १६.१०.२०१८.

२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण २७२२/प्र.क्र.६९/१-अे, २७.०६.२०२३.

३. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२७२४/प्र.क्र.४२/१-अे, २४.०९.२०२४.

४. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ./डॉपंदेनैशेमि/वेनिमा/३५०/२०२४, दि. २७.११.२०२४

**प्रस्तावना :-**

सेंद्रिय शेती/विषमुक्त शेती या राज्य पुरस्कृत योजनेअंतर्गत डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन विदर्भातील बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ व वर्धा या सहा जिल्हयात राबविण्यास संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनला सन २०२२-२३ ते सन २०२७-२८ पर्यंत मुदतवाढ देऊन योजनेची व्याप्ती राज्यभर वाढवून डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनला "डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशन" असे संबोधण्यास संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

सं.क्र.४ येथील पत्रान्वये, डॉ.पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशनवर प्रतिनियुक्तीद्वारे कार्यरत असलेल्या सात अधिकारी व कर्मचारी यांना सप्टेंबर-२०२४ ते फेब्रुवारी-२०२५ या कालावधीतील वेतन अदा करण्याची विनंती करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन सदर अधिकारी / कर्मचाऱ्यांना सप्टेंबर-२०२४ ते फेब्रुवारी-२०२५ या कालावधीतील वेतन अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१.	डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशनच्या अंमलबजावणीसाठी प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेल्या प्रकल्प संचालक-१, कृषी उपसंचालक (वर्ग-१) -१, तंत्र अधिकारी (वर्ग-२) - ५ या सात अधिकारी / कर्मचारी यांना सप्टेंबर-२०२४ ते फेब्रुवारी-२०२५ या कालावधीतील वेतन अदा करण्यासाठी मागणी क्र. डी-३ खालील "डॉ. पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशनसाठी मिशन प्रोजेक्ट मॅनेजमेंट बोर्ड यांना सहायक अनुदान (कार्यक्रमांतर्गत)" या योजनेसाठीच्या लेखाशीर्ष (२४०१ ए९३१), ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन ) या लेखाशीर्षाखाली रुपये रु.४१,६२,८२४/- (रुपये एकेचाळीस लाख बासष्ठ हजार आठशे चोवीस फक्त ) इतका निधी जिल्हा अधिक्षक व कृषि अधिकारी, अकोला यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२.	या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात करीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३.	सदर योजनेच्या राज्यस्तरीय अंमलबजावणीकरीता जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, अकोला यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून जिल्हा अधिक्षक व कृषि अधिकारी, अकोला यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.	प्रस्तुतचा शासन निर्णय वित्त विभागाने अनौ.संदर्भ क्रमांक १६७/२०२५/व्यय-१ दिनांक २९.५.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११५१०३१०२०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJESH HANMANT PADHYE

Digitally signed by RAJESH HANMANT PADHYE
DN: CN = RAJESH HANMANT PADHYE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2025.03.31 15:33:14 +05'30'

**( राजेश पाध्ये )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. मा.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. प्रकल्प संचालक, डॉ. पंजाबराव देशमुख नैसर्गिक शेती मिशन, अकोला.
११. सर्व प्रकल्प संचालक, आत्मा.

१२. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी,अकोला.
१४. लेखाधिकारी, जिल्हा अधिक्षक व कृषि अधिकारी कार्यालय, अकोला.
१५. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.